**भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळांच्या कक्षेतील नामनिर्देशनाच्या कोटयातील गट क वर्गीय <u>पदे भरताना अनुसरावयाची कार्यपध्दती.</u> लेखी परीक्षेमध्ये बॉलपेनचा वापर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक :- प्रानिमं २०१०/२०९/प्र.क्र.६६/१०/१३-अ
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १९ जून,२०१०.

वाचा :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रानिमं २००७/ प्र.क्र.४६/०७/१३-अ दिनांक १९ ऑक्टोबर, २००७.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रानिमं २००७ /प्र.क्र.४६/०७/१३-अ दिनांक २७ जून, २००८

<u>**शासन निर्णय**</u> :-

राज्य शासनाच्या दुय्यम सेवेतील नामनिर्देशनाच्या कोटयातील गट "क" मधील उमेदवारांची निवड करण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयांन्वये एकत्रित कार्यपध्दती निश्चित करण्यात आलेली आहे. या कार्यपध्दतीनुसार पदभरती करताना उमेदवारांच्या लेखी परीक्षा घेण्यात येतात. लेखी परीक्षेचे पेपर घेताना काही नियुक्ती प्राधिकारी उमेदवारांना पेन्सिलीचा वापर करण्यास मुभा देतात, यामुळे परीक्षेच्या उत्तरपत्रिकेमध्ये खाडाखोड करण्यास संधी मिळते. अशा स्वरुपाच्या तक्रारी काही लोकप्रतिनिधींकडून शासनास प्राप्त झाल्या आहेत. या तक्रारींच्या अनुषंगाने लेखी परीक्षेमध्ये फक्त बॉलपेनचाच वापर बंधनकारक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार आता खालीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

२. भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील पदांवरील नियुक्त्या करताना उमेदवारांची लेखी परीक्षा घेतेवेळी उत्तरपत्रिकेवर उत्तरे लिहिण्यासाठी अथवा चिन्हांकीत करण्यासाठी फक्त काळया शाईच्या बॉलपेनचा वापर करता येईल. सदरची बाब संबंधित निवड समितीने उमेदवारांना लेखी परीक्षेसाठी प्रवेशपत्रे पाठविताना उमेदवारांच्या निदर्शनास आणावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००६१८१९५१३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(के.पी.बक्षी)
प्रधान सचिव (सेवा)
महाराष्ट्र शासन

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. सर्व विधान परिषद व विधान सभा सदस्य, विधानभवन, मुंबई,
५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
* ८. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
* ९. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
* १०. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* ११. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
* १२. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* १३. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* १४. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* १५. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१७. सर्व विभागीय आयुक्त,
१८. सर्व जिल्हाधिकारी,
१९. सर्व मंत्रालयीन विभाग,
२०. मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक विभाग प्रमुख, कार्यालय प्रमुख,
२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई (२ प्रती),
२२. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२३. निवड नस्ती.

•

* पत्राने